**राष्ट्रीय सहकारी विकास निगम योजनेअंतर्गत मंजूरी प्रदान करण्यात आलेल्या ७ कृषी प्रक्रिया सहकारी संस्थांच्या प्रकल्पांना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय क्रमांक:प्रक्रिया-१११८/प्र.क्र.१३६/१-स**

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०००३२.

**दि.२३ ऑक्टोबर, २०१८**

वाचा:-

१) सहकार, पणन व वस्त्रोदयोग विभाग, शासन निर्णय क्र: प्रक्रिया-११२००४/प्र.क्र. १६२(अ)/९-स, दि. १२.१०.२००७.

२) रा.स.वि.नि. पत्र क्र.NCDC:३-४४/२०१७-FG/२९४/SA७०१९२/२७१, दि. ०७.०२.२०१८

३) रा.स.वि.नि. पत्र क्र.NCDC:३-४१/२०१७-FG/२९७/SA७०१९५/२७४, दि. ०८.०२.२०१८

४) रा.स.वि.नि. पत्र क्र.NCDC:३-४५/२०१७-FG/२९९/SA७०१९७/२७२, दि.०८.०२.२०१८

५) रा.स.वि.नि. पत्र क्र.NCDC:३-७८/२०१७-FG/२९६/SA७०१९४/१२१, दि.०८.०२.२०१८

६) रा.स.वि.नि. पत्र क्र.NCDC:३-४३/२०१७-FG/२९८/SA७०१९६/२७३, दि.०८.०२.२०१८

७) रा.स.वि.नि. पत्र क्र.NCDC:३-४२/२०१७-FG/२९५/SA७०१९५/२७५, दि.०८.०२.२०१८

८) रा.स.वि.नि. पत्र क्र.NCDC:५-७०/२०१७-F&V/३००/SA७०१९८/९२, दि.०८.०२.२०१८

९) वित्त विभाग, शासन निर्णय क्र: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दि. १७.०४.२०१५

प्रस्तावना:-

राज्यातील शेतकऱ्यांनी उत्पादित केलेल्या शेतमालास योग्य व रास्त भाव मिळावा तसेच,स्थानिक स्तरावर रोजगार निर्मिती व्हावी या उद्देशाने वाचा मधील क्र.१ च्या शासन निर्णयातील तरतूदींनुसार राज्यातील कृषी प्रक्रिया सहकारी संस्थांना प्रकल्पाची किंमत रु.५००.०० लाखाची कमाल मर्यादाचे अधिनस्त १:९ या प्रमाणात अर्थसहाय्य मंजूर करण्यात येते.

२. प्रधानमंत्री किसान संपदा योजनेअंतर्गत कृषी प्रक्रिया सहकारी संस्थांचे क्लस्टर उभारण्याचा प्रस्ताव ७ कृषी प्रक्रिया सहकारी संस्थांनी केंद्र शासनास सादर केलेला आहे. अशा प्रकारची क्लस्टर असणारी ही पहीलीच मागणी आहे. सदर ७ संस्थांचे क्लस्टर उभारण्यात येणार असल्यामुळे त्या संस्थांना प्रधानमंत्री किसान संपदा योजनेअंतर्गत एकत्रितरित्या पायाभूत सुविधा उभारण्यासाठी व त्यांची देखभाल करण्याकरिता केंद्र शासनाकडून अनुदान देण्यात येणार आहे. तद्नुषंगाने वाचा क्रमांक १ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार सदर ७ संसथांच्या प्रस्तावांची राष्ट्रीय सहकारी विकास निगमकडे अर्थसहाय्य मंजूरीसाठी विशेष बाब म्हणून अग्रक्रमाने अर्थसहाय्य मंजूरीसाठी राज्य शासनाकडून शिफारस करण्यात आलेली होती. सदर प्रकल्पांना वाचा मधील क्र.२ ते ८ मधील पत्रांद्वारे राष्ट्रीय सहकारी विकास निगमाकडून अर्थसहाय्य देण्याकरिता मंजूरी प्रदान करण्यात आलेली आहे. राष्ट्रीय सहकारी विकास निगमाने मंजूरी प्रदान केलेल्या ७ कृषी प्रक्रिया सहकारी संस्थांच्या प्रकल्पांना प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत शासन खालीलप्रमाणे आदेश देत आहे.

**शासन निर्णय:-**

राष्ट्रीय सहकारी विकास निगमाने खालील नमुद ७ कृषी प्रक्रिया सहकारी संस्थांच्या प्रकल्पांना अर्थसहाय्य मंजूर केलेले आहे. तद्नुषंगाने, कृषी प्रक्रिया सहकारी संस्थांना १:९ या प्रमाणात अर्थसहाय्य वितरित करण्याच्या योजनेंतर्गत खालील ७ कृषी प्रक्रिया सहकारी संस्थांच्या प्रकल्पांना प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**१) युवाशक्ती शेतीमाल प्रक्रिया सहकारी संस्था मर्यादित, आळते, ता. हातकणंगले, जि.कोल्हापूर**

सदर संस्थेची नोंदणी सहकार कायद्याअंतर्गत झालेली असून, संस्थेचा नोंदणी क्रमांक केपीआर/ एचएलई/पीआरडी/(ओ)/१५२/२००७-२००८/सन २००७, दिनांक ७/०८/२००७ असा आहे. संस्थेचे कार्यक्षेत्र **कोल्हापूर** जिल्ह्यापुरते मर्यादीत असून, संस्थेच्या रक्कम **रु.३५७.६७** लाख किमतीच्या **"डाळ प्रक्रिया"** प्रकल्पास राष्ट्रीय सहकारी विकास निगमाकडून दि.०७.०२.२०१८ रोजीच्या पत्राद्वारे खालील आकृतीबंधात अर्थसहाय्य मंजूर करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

| अ.क्र. | तपशिल | आकृती बंधाप्रमाणे (रु. लाखात) | आर्थिक आकृतिबंध (रु. लाखात) |
|---|---|---|---|
| १ | रा.स.वि.नि. कर्ज | ६०% | २१४.६० |
| २ | रा.स.वि.नि. कडून शासनास गुंतवणूक कर्ज तथा शासनाकडून संस्थेस भागभांडवल | ३६% | १२८.७६ |
| | एकूण:- | ९६% | ३४३.३६ |
| ३ | संस्थेचे स्वभागभांडवल | ४% | १४.३१ |
| | **एकूण:-** | **१००%** | **३५७.६७** |

**२) किसान ॲग्रो प्रोसेसिंग को-ऑप. सोसायटी लि. उंबर्डे, ता.वैभववाडी, जि.सिंधुदुर्ग.**

सदर संस्थेची नोंदणी सहकार कायद्याअंतर्गत झालेली असून, संस्थेचा नोंदणी क्रमांक केपीआर/व्हीडब्ल्यूडी/पीआरजी/(ओ)/११४/सन २०११, दिनांक २६.०४.२०११ असा आहे. संस्थेचे कार्यक्षेत्र **सिंधुदुर्ग** जिल्ह्यापुरते मर्यादीत असून, संस्थेच्या रक्कम **रु.३९१.८६** लाख किमतीच्या **"भात प्रक्रिया"** प्रकल्पास राष्ट्रीय सहकारी विकास निगमाकडून दि.०८.०२.२०१८ रोजीच्या पत्राद्वारे खालील आकृतीबंधात अर्थसहाय्य मंजूर करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

| अ.क्र. | तपशिल | आकृती बंधाप्रमाणे (रु. लाखात) | आर्थिक आकृतिबंध (रु. लाखात) |
|---|---|---|---|
| १ | रा.स.वि.नि. कर्ज | ६०% | २३५.१२ |
| २ | रा.स.वि.नि. कडून शासनास गुंतवणूक कर्ज तथा शासनाकडून संस्थेस भागभांडवल | ३६% | १४१.०७ |
| | एकूण:- | ९६% | ३७६.१९ |
| ३ | संस्थेचे स्वभागभांडवल | ४% | १५.६७ |
| | **एकूण:-** | **१००%** | **३९१.८६** |

**३) श्रेयश ॲग्रो प्रोसेसिंग को-ऑप. इंडस्ट्रीज लि. माणगांव ता. हातकणंगले, जि. कोल्हापूर**

सदर संस्थेची नोंदणी सहकार कायद्याअंतर्गत झालेली असून, संस्थेचा नोंदणी क्रमांक केपीआर/ एचएलई/पीआरजी/(ओ)/१५७/सन २००७, दिनांक २५.०७.२००८ असा आहे. संस्थेचे कार्यक्षेत्र **कोल्हापूर** जिल्ह्यापुरते मर्यादीत असून, संस्थेच्या रक्कम **रु. ३५५.६६** लाख किमतीच्या **"सोयाबीन प्रक्रिया"** प्रकल्पास राष्ट्रीय सहकारी विकास निगमाकडून दि.०८.०२.२०१८ रोजीच्या पत्राद्वारे खालील आकृतीबंधात अर्थसहाय्य मंजूर करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

| अ.क्र. | तपशिल | आकृती बंधाप्रमाणे (रु. लाखात) | आर्थिक आकृतिबंध (रु. लाखात) |
|---|---|---|---|
| १ | रा.स.वि.नि. कर्ज | ६०% | २१३.४० |
| २ | रा.स.वि.नि. कडून शासनास गुंतवणूक कर्ज तथा शासनाकडून संस्थेस भागभांडवल | ३६% | १२८.०४ |
| | एकूण:- | ९६% | ३४१.४४ |
| ३ | संस्थेचे स्वभागभांडवल | ४% | १४.२२ |
| | **एकूण:-** | **१००%** | **३५५.६६** |

**४) जयहिंद ॲग्रो प्रोसेसिंग को-ऑप. सोसायटी लि. आजरा, ता. आजरा, जि. कोल्हापूर**

सदर संस्थेची नोंदणी सहकार कायद्याअंतर्गत झालेली असून, संस्थेचा नोंदणी क्रमांक केपीआर/एचएलई/पीआरजी/(ओ)/१५७/सन २००७, दिनांक २५.०७.२००८ असा आहे. संस्थेचे कार्यक्षेत्र **कोल्हापूर** जिल्ह्यापुरते मर्यादीत असून, संस्थेच्या रक्कम **रु.३४५.९७ लाख** किमतीच्या **"काजू प्रक्रिया"** प्रकल्पास राष्ट्रीय सहकारी विकास निगमाकडून दि.०८.०२.२०१८ रोजीच्या पत्राद्वारे खालील आकृतीबंधात अर्थसहाय्य मंजूर करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

| अ.क्र. | तपशिल | आकृती बंधाप्रमाणे (रु. लाखात) | आर्थिक आकृतिबंध (रु. लाखात) |
|---|---|---|---|
| १ | रा.स.वि.नि. कर्ज | ६०% | २०७.५८ |
| २ | रा.स.वि.नि. कडून शासनास गुंतवणूक कर्ज तथा शासनाकडून संस्थेस भागभांडवल | ३६% | १२४.५५ |
| | एकूण:- | ९६% | ३३२.१३ |
| ३ | संस्थेचे स्वभागभांडवल | ४% | १३.८४ |
| | **एकूण:-** | **१००%** | **३४५.९७** |

**५) श्री महालक्ष्मी शेतीमाल प्रक्रिया सहकारी संस्था मर्यादित, आवळी बु., ता. राधानगरी, जि. कोल्हापूर**

सदर संस्थेची नोंदणी सहकार कायद्याअंतर्गत झालेली असून, संस्थेचा नोंदणी क्रमांक केपीआर/आरएनआय/पीआरजी/(ओ)/१६६-वाय.आर.२००९-१०, दि.१३.०५.२००९ असा आहे. संस्थेचे कार्यक्षेत्र **कोल्हापूर** जिल्ह्यापुरते मर्यादीत असून, संस्थेच्या रक्कम **रु.३९७.६६** लाख किमतीच्या **"भात प्रक्रिया"** प्रकल्पास राष्ट्रीय सहकारी विकास निगमाकडून दि.०८.०२.२०१८ रोजीच्या पत्राद्वारे खालील आकृतीबंधात अर्थसहाय्य मंजूर करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

| अ.क्र. | तपशिल | आकृती बंधाप्रमाणे (रु. लाखात) | आर्थिक आकृतिबंध (रु. लाखात) |
|---|---|---|---|
| १ | रा.स.वि.नि. कर्ज | ६०% | २३८.६० |
| २ | रा.स.वि.नि. कडून शासनास गुंतवणूक कर्ज तथा शासनाकडून संस्थेस भागभांडवल | ३६% | १४३.१५ |
| | एकूण:- | ९६% | ३८१.७५ |
| ३ | संस्थेचे स्वभागभांडवल | ४% | १५.९१ |
| | **एकूण:-** | **१००%** | **३९७.६६** |

**६) नॅशनल ॲग्रो प्रोसेसिंग को-ऑप. इंडस्ट्रीज लि. कोल्हापूर., ता. करवीर, जि. कोल्हापूर**

सदर संस्थेची नोंदणी सहकार कायद्याअंतर्गत झालेली असून, संस्थेचा नोंदणी क्रमांक केपीआर/केव्हीआर/पीआरजी/(ओ)/१५१/सन २००७, दिनांक ०७.०८.२००७ असा आहे. संस्थेचे कार्यक्षेत्र **कोल्हापूर** जिल्ह्यापुरते मर्यादीत असून, संस्थेच्या रक्कम **रु.४३७.१८ लाख** किमतीच्या **"भात प्रक्रिया"** प्रकल्पास राष्ट्रीय सहकारी विकास निगमाकडून दि.०८.०२.२०१८ रोजीच्या पत्राद्वारे खालील आकृतीबंधात अर्थसहाय्य मंजूर करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

| अ.क्र. | तपशिल | आकृती बंधाप्रमाणे (रु. लाखात) | आर्थिक आकृतिबंध (रु. लाखात) |
|---|---|---|---|
| १ | रा.स.वि.नि. कर्ज | ६०% | २६२.३१ |
| २ | रा.स.वि.नि. कडून शासनास गुंतवणूक कर्ज तथा शासनाकडून संस्थेस भागभांडवल | ३६% | १५७.३८ |
| | एकूण:- | ९६% | ४१९.६९ |
| ३ | संस्थेचे स्वभागभांडवल | ४% | १७.४९ |
| | **एकूण:-** | **१००%** | **४३७.१८** |

**७) मेट्रो ॲग्रो प्रोसेसिंग को-ऑप. सोसायटी लि. वड्डी ता. मिरज, जि. सांगली**

सदर संस्थेची नोंदणी सहकार कायद्याअंतर्गत झालेली असून, संस्थेचा नोंदणी क्रमांक एसएएन/एमआरजे/पीआरजी/(ओ)/११८/२००८-०९/सन २००८, दिनांक १८.१२.२००८ असा आहे. संस्थेचे कार्यक्षेत्र **सांगली** जिल्ह्यापुरते मर्यादीत असून, संस्थेच्या रक्कम **रु.४३७.१८ लाख** किमतीच्या **"द्राक्ष प्रक्रिया"** प्रकल्पास राष्ट्रीय सहकारी विकास निगमाकडून दि.०८.०२.२०१८ रोजीच्या पत्राद्वारे खालील आकृतीबंधात अर्थसहाय्य मंजूर करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

| अ.क्र. | तपशिल | आकृती बंधाप्रमाणे (रु. लाखात) | आर्थिक आकृतिबंध (रु. लाखात) |
|---|---|---|---|
| १ | रा.स.वि.नि. कर्ज | ६०% | २९४.२८ |
| २ | रा.स.वि.नि. कडून शासनास गुंतवणूक कर्ज तथा शासनाकडून संस्थेस भागभांडवल | ३६% | १७६.७० |
| | एकूण:- | ९६% | ४७०.८४ |
| ३ | संस्थेचे स्वभागभांडवल | ४% | १९.६२ |
| | **एकूण:-** | **१००%** | **४९०.४६** |

**२.** उपरोक्त परिच्छेदामध्ये नमुद ७ संस्थांच्या प्रकल्पांना रा.स.वि.नि. ने मंजूर केलेल्या आकृतीबंधात खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे.

अ) सदर संस्थांना दि.१२.१०.२००७ रोजीच्या शासन निर्णयामधील सर्व अटी व शर्तीचे आवश्यक त्या सुधारणांसह पालन करणे अनिवार्य राहील.

आ) सदर संस्थांना शासनाच्या भागभांडवल परतफेडीच्या नेहमीच्या अटी व शर्ती (त्यात काही सुधारणा/बदल असल्यास त्यासह) बंधनकारक राहतील.

इ) सदर प्रकल्पांतर्गत होणाऱ्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र आणि लेखापरिक्षा अहवाल वेळोवेळी सादर करणे संस्थांना अनिवार्य राहील.

ई) संस्थांनी रा.स.वि.नि. च्या मंजूरी आदेशामध्ये दर्शविण्यात आल्यानुसार बाबवार प्रकल्पावर खर्च करावा, यामध्ये वाढ झाल्यास त्याप्रमाणे शासनाची पूर्वपरवानगी घेण्यात यावी. तथापी, वाढीव खर्च स्वबळावर करावा.

उ) सदर संस्थांनी भागभांडवल उभारुन शेअर सर्टीफीकेट वितरीत केल्यानंतर त्यांना शासकीय भागभांडवलाचा पहिला हप्ता उपलब्ध अर्थसंकल्पीय तरतुद व अन्य संस्थांची मागणी लक्षात घेऊन वितरित करण्यात येईल.

ऊ) संस्थांनी स्वभागभांडवलापोटी भागधारकांना प्रमाणपत्र (शेअर सर्टीफीकेट) वितरीत केल्याबाबतचा पुरावा रजिस्टरच्या नोंदवहीसह सादर करणे बंधनकारक राहील.

ए) सदर योजनेकरिता वार्षिक अर्थसंकल्पात ज्या प्रमाणात निधीची उपलब्धता होईल, त्यानुसार सदर संस्थांच्या प्रकल्पास योग्य त्या हप्त्यामध्ये निधीचे वितरण करण्यात येईल.

ऐ) रा.स.वि.नि. च्या मंजूरी आदेशामध्ये नमुद केलेल्या अटी व शर्ती आहे त्याच स्वरुपात सदर संस्थांना लागू राहतील.

**३.** संस्थांना सदर प्रकल्पासाठी वेळोवेळी शासनाकडून देण्यात येणाऱ्या रक्कमेचा विनियोग संस्था आवश्यक त्याच बाबींकरिता करीत आहे, याबाबतचे नियंत्रण पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी ठेवावे व याबाबतचा अहवाल शासनास वेळोवेळी सादर करण्यात यावा. त्याचप्रमाणे पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे व संबंधीत जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था यांनी संस्थेच्या कामकाजावर आणि प्रकल्प उभारणीवर लक्ष ठेवावयाचे आहे. विहीत वेळेत प्रकल्प उभारणी करणे, शासनाच्या रा.स.वि.नि. सह अर्थसहाय्याची परतफेड होईल, त्यात अनियमितता होणार नाही यांची सर्वस्वी देखरेख करावी.

**४.** पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी सदर तिमाही अहवाल तपासून न चुकता शासनास सादर करावा. जर या कामी संस्थांकडून कुचराई झाल्यास मंजूर अर्थसहाय्याची एकरकमी वसुली करण्याचे अधिकार शासन राखून ठेवीत आहे. संस्थांचे प्रकल्प विहित मुदतीत पूर्ण करण्याबाबत संस्थांनी योग्य ती काळजी घ्यावी, याबाबत संस्थांच्या संचालकांना/पदाधिकाऱ्यांना जबाबदार धरण्यात येईल.

**५.** या प्रकल्पांच्या खर्चामध्ये वाढ झाल्यास सदर वाढीव किंमत संस्थांनी स्वबळावर उभी करावयाची आहे. वाढीव प्रकल्प किंमतीमध्ये शासनाच्या अर्थसहाय्याचा कोणताही सहभाग राहणार नाही याची संस्थांनी नोंद घ्यावी.

**६.** हे आदेश वित्त विभागाचे वाचा मधील क्रमांक ९च्या शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/ २०१३/ विनियम, भाग-२, दि.१७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ४, परिच्छेद क्र.२७(२) (अ) नुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

**७.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यातआला असून त्याचा संकेताक २०१८१०२४११४४०४८७०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Jaiprakash Mansaramji Ambade

Digitally signed by Jaiprakash Mansaramji Ambade
DN: CN = Jaiprakash Mansaramji Ambade, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Cooperative Marketing
Date: 2018.10.24 11:55:26 +05'30'

**( ज.म. अंबादे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

०१. मा. राज्यपाल महोदय यांचे प्रधान सचिव
०२. मा. मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव
०३. मा. मंत्री (पणन) यांचे खाजगी सचिव
०४. मा.राज्यमंत्री (पणन) यांचे खाजगी सचिव
०५. महालेखापाल-१ (लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
०६. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
०७. महालेखापाल-२ (लेखा परिक्षा), महाराष्ट्र, नागपूर.
०८. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर.
०९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
११. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
१२. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१३. पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१४. कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (कार्या.१४३१) मंत्रालय, मुंबई.
१५. कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-२)/(अर्थसंकल्प-१३), मंत्रालय, पुणे.
१६. संबंधीत सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था,
१७. लेखाधिकारी, पणन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१.
१८. कार्यासन अधिकारी (१७-स), सहकार, पणन व वस्त्रोदयोग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१९. कार्यासन अधिकारी (२१-स), सहकार, पणन व वस्त्रोदयोग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२०. अध्यक्ष, "युवाशक्ती शेतीमाल प्रक्रिया सहकारी संस्था मर्यादित, आळते, ता. हातकणंगले, जि.कोल्हापूर"
२१. अध्यक्ष, "किसान ॲग्रो प्रोसेसिंग को-ऑप. सोसायटी लि. उंबर्डे, ता.वैभववाडी, जि.सिंधुदुर्ग."
२२. अध्यक्ष, "श्रेयश ॲग्रो प्रोसेसिंग को-ऑप. इंडस्ट्रीज लि. माणगांव ता. हातकणंगले, जि. कोल्हापूर"
२३. अध्यक्ष,"जयहिंद ॲग्रो प्रोसेसिंग को-ऑप. सोसायटी लि. आजरा, ता. आजरा, जि. कोल्हापूर"
२४. अध्यक्ष,"श्री महालक्ष्मी शेतीमाल प्रक्रिया सहकारी संस्था मर्यादित, आवळी बु., ता. राधानगरी, जि. कोल्हापूर"
२५. अध्यक्ष," नॅशनल ॲग्रो प्रोसेसिंग को-ऑप. इंडस्ट्रीज लि. कोल्हापूर., ता. करवीर, जि. कोल्हापूर"
२६. अध्यक्ष,"मेट्रो ॲग्रो प्रोसेसिंग को-ऑप. सोसायटी लि. वड्डी ता. मिरज, जि. सांगली"
२७. निवडनस्ती (१-स).